**वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांच्या मान्यतेस अनुसरुन शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून राज्यात वास्तुशास्त्र अभ्यासक्रमाची नवीन संस्था/नवीन <u>अभ्यासक्रम सुरू करण्यास मान्यता देण्याबाबत...</u>**
**फ्लोरा एज्युकेशन सोसायटी, पुणे यांचे फ्लोरा कॉलेज ऑफ आर्किटेक्चर, मु.पो.खोपी, ता.भोर, जि.पुणे.**

**महाराष्ट्र शासन**
**उच्च व तंत्रशिक्षण विभाग**
**शासन निर्णय क्र.टीईएम-२०१६/प्र.क्र.४३५ (भाग-२)/तांशि-४**
मंत्रालय विस्तार भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरू चौक,मुंबई-४०० ०३२
दिनांक: ०९ जून, २०१७.

**<u>संदर्भ</u> :-** १) वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांचे पत्र क्र. CA/५/Academic-MH९७, दिनांक ०८.०८.२०१६
२) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/ एनसीजी/मान्यता/२०१६/२३८४, दि.३१.१२.२०१६.
३) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/ एनसीजी/मान्यता/२०१६/८६, दि.२०.०१.२०१७.
४) संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांचे पत्र क्र.२/ एनसीजी/(मान्यता/२०१७/४८५, दि.१८.०४.२०१७.

**<u>प्रस्तावना</u> :**

उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक-१ येथील पत्रान्वये वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी शैक्षणिक वर्ष २०१६-१७ पासून फ्लोरा एज्युकेशन सोसायटी, पुणे यांचे फ्लोरा कॉलेज ऑफ आर्किटेक्चर, मु.पो.खोपी, ता.भोर, जि.पुणे-४१२ २०५ या संस्थेस वास्तुशास्त्र पदवी हा अभ्यासक्रम ४० प्रवेशक्षमतेसह सुरू करण्यास दिलेल्या मान्यतेनुसार संदर्भाधीन क्रमांक-२ येथील पत्रान्वये संचालक, तंत्र शिक्षण यांनी शासन मान्यता देणेबाबतचा प्रस्ताव सादर केला होता.तथापि, शासनाच्या निर्देशानुसार करण्यात आलेल्या संस्थेच्या पुनर्तपासणी अहवालास अनुसरून, संचालक, तंत्र शिक्षण यांनी, शैक्षणिक वर्ष २०१६-१७ ची प्रवेश प्रक्रिया समाप्त झाली असल्याने उक्त संस्थेस शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून वास्तुशास्त्र पदवी अभ्यासक्रम ४० प्रवेश क्षमतेसह सुरू करण्यास शासन मान्यता देण्याबाबत, संदर्भाधीन क्र.३ व ४ अन्वये प्रस्ताव सादर केला आहे.सदर प्रस्तावास अनुसरून फ्लोरा एज्युकेशन सोसायटी, पुणे यांचे फ्लोरा कॉलेज ऑफ आर्किटेक्चर, मु.पो.खोपी, ता.भोर, जि.पुणे-४१२ २०५ या संस्थेस शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून वास्तुशास्त्र पदवी अभ्यासक्रम ४० प्रवेश क्षमतेसह सुरू करण्यास शासन मान्यता देण्याची बाब विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी उपरोक्त संदर्भाधीन क्रमांक-१ येथील पत्रान्वये दिलेली मान्यता व संचालक, तंत्र शिक्षण यांच्याकडून संदर्भाधीन क्रमांक-२ ते ४ येथील पत्रान्वये प्राप्त प्रस्ताव विचारात घेऊन खालील तक्त्यात नमूद केल्यानुसार संस्थेस तिच्या नावासमोर दर्शविल्यानुसार नवीन वास्तुशास्त्र पदवी अभ्यासक्रम सुरू करण्यास शैक्षणिक वर्ष २०१७-१८ पासून खालील अटी व शर्तींच्या अधीन राहून शासनाची मान्यता देण्यात येत आहे.

| अ.क्र. | महाविद्यालयाचे नाव | अभ्यासक्रम | प्रवेश क्षमता व कालावधी |
|---|---|---|---|
| १. | **फ्लोरा एज्युकेशन सोसायटी, पुणे यांचे फ्लोरा कॉलेज ऑफ आर्किटेक्चर, मु.पो.खोपी, ता.भोर, जि.पुणे-४१२ २०५** | **वास्तुशास्त्र पदवी** | **४०<br>(५ वर्षे पूर्ण वेळ)** |

१. सदर मंजूरी कायम विना अनुदान तत्वावर राहील.

२. प्रस्तुत बाबतीत वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या तसेच दिनांक २१ मे, १९८३ च्या शासन निर्णयान्वये विहित केलेल्या अटींची पूर्तता करणे संबंधित संस्थेस बंधनकारक राहील. सदर अभ्यासक्रमासाठी संस्थेची प्रवेक्षक्षमता वर नमूद केल्याप्रमाणे राहील.

३. शासनाने विहित केलेल्या तसेच वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांनी विहित केलेल्या सर्व अटी व शर्ती मान्य असल्याबाबत संस्थेस करारनामा करावा लागेल. तसेच संबंधित कागदपत्रांची आणि औपचारिक बाबींची पूर्तता संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्या संमतीने समाधानकारकरित्या करण्यात येईल.

४. सदर अभ्यासक्रमाच्या संलग्नीकरणासाठी संबंधित संस्थेने महाराष्ट्र सार्वजनिक विद्यापीठ अधिनियम, २०१६ मधील तरतूदीनुसार संबंधित विद्यापीठाची मान्यता / संलग्नीकरण घेणे आवश्यक राहील.

५. संबंधित संस्थेने संचालक, तंत्र शिक्षण यांचेकडे आवश्यक ती संचित ठेव संयुक्त खात्यात भरुन इतर कायदेशीर बाबींची पूर्तता करावी.

६. सदर पदवी अभ्यासक्रमाचे प्रवेश शासनाने मान्य केलेल्या संबंधित अभ्यासक्रमाच्या प्रवेश नियमानुसार /पद्धतीनुसार करण्यात येतील.

७. शुल्क नियामक प्राधिकरणाने विहित केलेल्या शिक्षण शुल्कापेक्षा जास्त शुल्क संबंधित संस्थांनी आकारल्यास त्या संस्थांवर महाराष्ट्र एज्युकेशनल इन्स्टिट्यूशन (प्रोहिबिशन ऑफ कॅपिटेशन फी) ॲक्ट, १९८७ अनुसार कारवाई करण्यात येईल.

८.संस्थेने अभ्यासक्रम चालविण्यास पूर्णवेळ शिक्षकवृंद व इतर तंत्रिक कर्मचारी शासन नियमाप्रमाणे नियुक्त करावेत.त्यांना नियमानुसार वेतन आणि भत्ते देण्यात यावेत.सदर वेतन व भत्त्यांबाबत तसेच विद्यार्थ्यांकडून शासनाकडे तक्रारी प्राप्त झाल्यास संस्थेवर कडक कारवाई करण्यात येईल.

९. संस्थेतील ग्रंथालयास आवश्यक ती पुस्तके, नियतकालिके वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांच्या मानकानुसार खरेदी करणे आवश्यक आहे. तसेच विद्यार्थ्यांना वाचनालयाचा पुरेपूर उपयोग होण्याच्या दृष्टीने ग्रंथालयात विद्यार्थ्यांना अभ्यासिकेची सोय करणे आवश्यक आहे .तसेच विद्यार्थ्यांना वास्तुकला परिषद, नवी दिल्ली यांच्या मानकाप्रमाणे सर्व शैक्षणिक सोयीसुविधा (उदा. प्रयोगशाळा, वाचनालय, वर्गखोल्या इ.) उपलब्ध करणे आवश्यक आहे.

१०. रॅगिंग संदर्भात मा. सर्वोच्च न्यायालयाचे निर्देश व महाराष्ट्र प्रोहिबिशन ऑफ रॅगिंग ॲक्ट, १९९९ यांची कठोरपणे अंमलबजावणी करणे आवश्यक राहील.

११. याशिवाय संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई व संबंधित विद्यापीठ यांनी घालून दिलेल्या अन्य अटी व शर्ती लागू राहतील.

१२. संस्थेने संचालक, तंत्रशिक्षण, महाराष्ट्र राज्य यांच्याकडे प्रोसेसिंग फी अदा केली नसल्यास संचालकांनी अंतिम मान्यता देण्यापूर्वी ती संस्थेकडून वसूल करावी.

हा शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करुन देण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१७०६०९१०५७४७९३०८ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sanjay A. Dharurkar

Digitally signed by Sanjay A. Dharurkar
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Higher and Technical Education Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=637145fd393d6d5c713e94e6da7bc6bee23011448b7fc64d138630b9c76ae7a2, cn=Sanjay A. Dharurkar
Date: 2017.06.09 12:33:35 +05'30'

**( सं.औ.धारुरकर )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रति,**

१.संचालक, तंत्र शिक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२.सहसंचालक, तंत्र शिक्षण विभागीय कार्यालय , पुणे.
३.कुलसचिव,सावित्रीबाई फुले पुणे विद्यापीठ, पुणे (संचालक, तंत्रशिक्षण मार्फत)
४.संबंधित संस्था (संचालक, तंत्र शिक्षण यांच्यामार्फत)
५.प्रबंधक, वास्तुकला परिषद, इंडीया हॅबीटॅट सेंटर, कोअर-६ ए, पहिला मजला, लोधी रोड, नवी दिल्ली ११० ००३.
६.सहायक शिक्षण सल्लागार (तांत्रिक), भारत सरकार, मनुष्यबळ विकास मंत्रालय (शिक्षण विभाग), नवी दिल्ली.
७.निवड नस्ती/तांशि-४